**संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या सरहद्दीवर संरक्षक भिंत बांधण्याच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.डल्ब्युएलपी ०२.२५/प्र.क्र. ६३/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २४ फेब्रुवारी, २०२५

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई त्यांचे पत्र क्रमांक:- मुअ(मुं)/ का-१/५८०/२०२५, दिनांक ०४.०२.२०२५.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई त्यांचे पत्र क्रमांक:- मुअ(मुं)/ का-१/५८५/२०२५, दिनांक ०४.०२.२०२५
४. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संयज गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांचे पत्र क्रमांक कक्ष-३/योजना/प्र.क्र. २१/८७२/२०२४-२५, दिनांक १३.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाचे हद्दीवरील अतिक्रमण रोखणे, वनसंपदेचे रक्षण करणे व उद्यान क्षेत्राबाहेर बिबट्याचा शिरकाव कमी करणे याकरीता वनहद्दीवर संरक्षक भिंत बांधणे आवश्यक आहे. तसेच राष्ट्रीय उद्यानातील मौल्यवान जंगल व उद्यान क्षेत्र हे कायम जपून ठेवणे, वन्यप्राण्यांचे संरक्षण करणे, पर्यावरणाचे मानवी जीवनाशी असलेले अतुट नाते कायम ठेवणे याकरीता राष्ट्रीय उद्यानाचे संरक्षण करणे गरजेचे आहे.

या अनुषंगाने संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाचे वनहद्दीवर संरक्षक भिंत बांधण्याच्या अंदाजपत्रकास मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांनी संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची विनंती केली आहे.

**शासन निर्णय :-**

संजय गांधी राष्ट्रीय उद्यानाच्या हद्दीवर संरक्षक भिंत बांधण्याचे सोबतच्या विवरणपत्रात नमुद केल्याप्रमाणे रु. १०,१९,८८,२०४/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये तांत्रिक सहमती प्रदान केली आहे त्या अनुषंगाने खालील अटींच्या अधिन राहून (वित्तीय मान्यता वगळून) शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :

i. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
ii. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

iii. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियमातील तरतूदींचा भंग होणार नाही तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

iv. अंदाजपत्रकातील बाबी मूळ ढोबळ बाबींच्या कार्यान्वयनाकरीता आहेत याची अंमलबजावणी पूर्वी खात्री करावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४ (१), १३४ (२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२४१६३८२३२८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK VIJAY HOSHING

Digitally signed by VIVEK VIJAY HOSHING
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7e3227e15fe5debe28837d6e68d17c1f6e96d1a6dc7f27bc7e0f3ec07bbdfab8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B1AFE499C80878329FBB017E4922F7356CC5EDC76102E8FF88C7B9A67A322D9, cn=VIVEK VIJAY HOSHING
Date: 2025.02.24 16:39:00 +05'30'

**(विवेक होशिंग)**
उप सचिव (वने)
महसूल व वन विभाग

प्रति,

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पश्चिम, मुंबई.
५. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

*******

शासन निर्णय क्रमांक डब्ल्युएलपी ०२.२५/प्र.क्र.६३/फ-१, दि. २४ फेब्रुवारी, २०२५ सोबतचे विवरणपत्र.

| **अ. क्र.** | **कामाचे नाव** | **अंदाजपत्रकीय रक्कम** |
|---|---|---|
| १ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall at Pachpakahadi Survey No ५१९, Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | ४,३१,१७,६१२ |
| २ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall at Ghadbunder beat from Varsave gaon to Piyush pani Mandir, Survey No ३, Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | १,२८,३२,९७९ |
| ३ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall at Ghadbunder beat from Piyush pani Mandir to Private wall, Survey No ३, Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | १,२८,३२,९७९ |
| ४ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall near Masjid at Kashi Survey No १०६ pt, Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | १,१२,२८,१५७ |
| ५ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall from Masjid to Private wall at Kashi Survey No १०६ pt, Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | ८०,२०,६१२ |
| ६ | Construction of Reinforced Cement Concrete Compound wall at Village Chena, Survey No ८९ of Range Yeur of Sanjay Gandhi National Park, Mumbai. | १,३९,५५,८६५ |
| | **एकूण** | **१०,१९,८८,२०४** |

******